**कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन कला संस्थांमध्ये /जुन्या कला संस्थांमध्ये नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता व जुन्या कला संस्थांमध्ये नवीन तुकडी शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून कायम विनाअनुदानित तत्वावर सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र अेडीआर २७१४/प्र. क्र.२५/तांशि ६**
मंत्रालय, विस्तार भवन,
मुबंई-४०००३२.
दिनांक - ३ जुलै, २०१७.

वाचा:-१. शा.नि, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. अेडीआर-२०१४/प्र.क.१८८/तांशि-६ दिनांक १६ मार्च, २०१७ .
२. प्र. कला संचालक, महाराष्ट्र राज्य , मुंबई यांचे क्र. डिओअे -२०१७/दोन/५४२ दिनांक १६ मार्च, २०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील पदविका अभ्यासक्रमाच्या नवीन कला संस्था/ जुन्या कला संस्थेत नवीन अभ्यासक्रम/नवीन तुकडी सुरु करण्यास मान्यता देण्यासंदर्भात शासन निर्णय दि.१६.३.२०१६अन्वये कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार कला संचालनालयाकडे प्राप्त झालेल्या प्रस्तावांची संचालनालयाने व्दिस्तरीय समितीमार्फत प्राथमिक तपासणी केली. प्राथमिक तपासणी अहवालाची पडताळणी टास्क फोर्स समितीच्या बैठकीमध्ये करण्यात येऊन पडताळणी अंती आढळून आलेल्या त्रुटींची पूर्तता करण्याबाबत संबंधित संस्थांना कला संचालनालयाकडून कळविण्यात आले. संस्थांनी त्रुटींची पूर्तता केल्यानंतर दि.१६.३.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित केलेली कार्यपध्दती, अभ्यासक्रमांची निकड व विद्यार्थी हित लक्षात घेऊन प्र.कला संचालक यांच्या अध्यक्षतेखालील समितीच्या बैठकीमध्ये तपासणी अहवालांची पडताळणी केल्यानंतर संचालनालयाने प्रस्ताव शिफारशीसह शासनास सादर केले.सदर शिफारशीस अनुसरून विविध पदविका अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून कायम विनाअनुदानित तत्वावर नवीन कला संस्थांमध्ये सुरु करण्यास मान्यता, जुन्या कला संस्थांमध्ये नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता व जुन्या कला संस्थांमध्ये नवीन तुकडी सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्र. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुबंई, यांच्या शिफारशीस अनुसरून खालील कला संस्थेमध्ये सन २०१७-१८ पासून कायम विना अनुदानित तत्वावर नवीन कला संस्थांमध्ये खालीलप्रमाणे अभ्यासक्रम सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क | जिल्हा | संस्थेचे नांव | कला महाविदयालयाचे नाव | अभ्यासक्रम | विदयार्थी |
|---|---|---|---|---|---|
| १. | लातूर | कला पुष्प शिक्षण विकास मंडळ , मुरूड | मॉडर्न इंटरनॅशनल इन्टेरियल डेकोरेशन कॉलेज, लातूर | अंतर्गत गृह सजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| २. | औरंगाबाद | रामजी बोदडे मानव कल्याण बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, औरंगाबाद | आकार चित्र व शिल्प कला महाविदयालय, औरंगाबाद | १.शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २ धातुकाम | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ३ | मुंबई | श्री. केशव गोंविद ग्रामविकास मंडळ, जि. अहमदनगर | श्री. मंदीलकर स्कूल ऑफ आर्ट, मुंबई | शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ४ | उस्मानाबाद | कलापुष्प विकास शिक्षण मंडळ , शिवाजी नगर,मुरूड जि. लातूर | व्हिज्युअलाईज मॉडर्न आर्ट कॉलेज, उस्मानाबाद | अंतर्गत गृह सजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ५ | ठाणे | ज्ञान विकास संस्था, ज्ञान विकास संकुलन, कौपरखैराने. | डी.व्ही.एस. बीग आर्ट महाविदयालय, नवी मुंबई कौपरखैराने. | अंतर्गत गृह सजावट | ३० विदयार्थी संख्या (२ वर्ग) |
| ६ | नागपूर | न्यू इंग्लीश हायस्कूल असोशीशन कॉग्रेस नगर, नागपूर | न्यू इंग्लीश कॉलेज ऑफ फाईन आर्ट , नागपूर | शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ७ | मुंबई | ललित कला बहुउद्देशीय शैक्षणिक सेवाभावी संस्था, उद्गगीर, लातूर | मॉडर्न आर्ट इंटेरिअर डेकोरेशन इन्स्टिटयूट, साकीनाका, मुंबई. | १.मुलभूत | ३० विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.अंतर्गत गृह सजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ८ | सातारा | प्रथमेश शिक्षण संस्था, सातारा | प्रथमेश कला महाविदयालय, सातारा | अंतर्गत गृह सजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ९ | उस्मानाबाद | श्री. संत कैकडी महाराज शिक्षण संस्थां, पाथर्डी. | सृजन स्कूल ऑफ आर्ट उस्मानाबाद. | १.मुलभुत | ३० विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.रेखा व रंगकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | ३.शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| १० | मुंबई | श्री. संत कैकडी महाराज शिक्षण संस्थां, पाथर्डी. | एन. जे. स्कूल ऑफ आर्ट नायगांव, मुंबई. | १.मुलभुत | ३० विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.रेखा व रंगकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | ३.शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | ४.अंतर्गत गृह सजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |

२. तसेच अस्तित्वात असलेल्या कला संस्थांमध्ये खालीलप्रमाणे नवीन अभ्यासक्रम सन २०१७-१८ पासून कायम विना अनुदानित तत्वावर सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | जिल्हा | संस्थेचे नाव | कला महाविदयालयाचे नांव | अभ्याक्रम | विदयार्थी क्षमता |
|---|---|---|---|---|---|
| १ | नाशिक | महात्मा गांधी विदया मंदीर , नाशिक | समाज श्री. प्रशांत दादा हीरे इन्स्टीटूट ऑफ म्युझीक ॲन्ड फाईन आर्ट, मालेगांव | १.अंतर्गत गृहसजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.वस्त्र प्रावरणे | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| २ | औरंगाबाद | महात्मा गांधी मिशन सिडको , औरंगाबाद. | महात्मा गांधी मिशनचे कॉलेज ऑफ फाईन आर्ट औरंगाबाद. | १. मातकाम | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.वस्त्र प्रावरणे | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ३ | सांगली | नवभारत शिक्षण मंडळ सांगली. | कला विश्व महाविदयालय, सांगली. | १.शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.मातकाम | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ४ | गोंदिया | श्रीमती उमाबाई बहुउद्देशीय संस्था. | प्रोग्रेसिव्ह चित्रकला महाविदयालय, गोंदिया. | रेखा व रंगकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ५ | औरंगाबाद | साक्री तालुका एज्युकेशन सोसायटी, साक्री. | यशंवत कला महाविदयालय औरंगाबाद | १.शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.अंतर्गत गृहसजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ६ | धुळे | शिवाजी विदया प्रसारक संस्था | श्री. शिवाजी विदया प्रसारक संस्थेचे स्कूल ऑफ आर्ट धुळे. | अंतर्गत गृहसजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ७ | सोलापूर | प्रथमेश शिक्षण संस्था, सोलापूर | प्रथमेश कॉलेज ऑफ फाईन आर्ट , मंगळवेडा. | वस्त्र प्रावरणे | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ८ | अहमदनगर | कला विकास मंडळ, अहमदनगर | रचना चित्रकला महाविदयालय, अहमदनगर. | शिल्पकला | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |

३. त्याचप्रमाणे खालील कला संस्थांमध्ये सन २०१७-१८ पासून कायम विना अनुदानित तत्वावर नवीन तुकडीवाढ करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | जिल्हा | संस्थेचे नाव | कला विदयालयाचे नाव | अभ्यासक्रम | विदयार्थी क्षमता |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुंबई | कला विदया संकुल पॉलिटेक्निक, चर्नीरोड. | कला विदया संकुल पॉलिटेक्निक ,चर्नीरोड, मुंबई | मुलभूत | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| २ | औरंगाबाद | महात्मा गांधी मिशन सिडको , औरंगाबाद. | महात्मा गांधी मिशनचे कॉलेज ऑफ फाईन आर्ट औरंगाबाद. | १.मुलभूत | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.अंतर्गत गृहसजावट | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ३ | धुळे | श्री.शिवाजी विदया प्रसारक संस्था | श्री शिवाजी विदया प्रसारक संस्थेचे स्कूल ऑफ आर्ट, धुळे. | १.मुलभूत | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| | | | | २.वस्त्रे प्रावरणे | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ४ | नाशिक. | मराठा विदया प्रसारक समाज, नाशिक | ललित कला महाविदयालय , नाशिक | अंतर्गत गृहसजावट | ३० विदयार्थी संख्या (२ वर्ग) |
| ५ | पालघर | वसई विकासिनी भवन, वसई. | वसई विकासीनी दृक कला महाविदयालय वसई. | मुलभूत | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |
| ६ | औरंगाबाद | साक्री तालुका एज्युकेशन सोसायटी. | यशंवत कला महाविदयालय, औरंगाबाद | .मुलभूत | १५ विदयार्थी संख्या (१ वर्ग) |

४. वरील तक्त्यांमध्ये नमूद केलेल्या नवीन कला संस्थांना मान्यता/ अस्तित्वात असलेल्या कला संस्थेमध्ये नवीन अभ्यासक्रम / नवीन तुकडी सुरु करण्यास खालील अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती :</u>**

१) शासन मान्यता देण्यात आलेल्या नवीन कला संस्था/नवीन अभ्यासक्रम/नवीन तुकडी सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षामध्ये सुरु न केल्यास, सदर संस्थेस दिलेली शासन मान्यता रद्द समजण्यात येईल.

२) मुलभूत अभ्यासक्रमांस शासन निर्णय क्र.एईडी-१२९४/(२२५)/साशि-५, दि.२०.९.१९९४ व शासन निर्णय क्र.अेडीआर-२००७/(११४/०७)अ/तांशि-७, दि.३१.८.२००७ अन्वये विहित केलेल्या अर्हतेनुसार प्रवेश देण्यात येतील व शिल्पकला, रेखा व रंगकला, अंतर्गत गृहसजावट, मातकाम, वस्त्रकाम, धातूकाम या पदविका अभ्यासक्रमांना मुलभूत उत्तीर्ण विद्यार्थ्यांना गुणवत्तेनुसार प्रवेश देण्यात येतील.

३) संबंधित पदविका अभ्यासक्रमासाठी प्रती विद्यार्थी शिक्षण शुल्क व इतर अनुषंगिक शुल्क शासन निर्णय क्र.एडीआर-१२८७/५७५०३/(७३३५)/तांशि-३, दि.१७.५.१९८८ व शासन निर्णय क्र.एडीआर-२०११/प्र.क्र.१५२/तांशि-६, दि.२७.२.२०१७ अन्वये विहित केल्याप्रमाणे असेल.

४) संबंधित पदविका अभ्यासक्रमाकरिता एखाद्या शैक्षणिक वर्षामध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतला असल्यास सतत २ वर्षे कला संस्थेची/अभ्यासक्रमाची/तुकडीची तपासणी करुन सलग २ वर्षे मानकानुसार विद्यार्थी संख्येची अट पूर्ण न केल्यास तिस-या वर्षी कला

संस्थेची/अभ्यासक्रमाची/तुकडीची मान्यता ठेवावी किंवा कसे याबाबत संचालक, कला संचालनालयामार्फत अहवालासह शासनास प्रस्ताव सादर करण्यात येईल व त्यानुसार सदर कला संस्थेबाबतचा निर्णय शासन घेईल.

५) प्रत्येक विद्यार्थ्याची शैक्षणिक वर्षामध्ये किमान ७५% उपस्थिती असणे अनिवार्य राहील.

६) संबंधित पदविका अभ्यासक्रमाची तपासणी कला संचालनालयाच्या अखत्यारितील तज्ञ समितीकडून करण्यात येईल.

७) संबंधित पदविका अभ्यासक्रमाची सार्वजनिक परीक्षा कला संचालनालयाकडून घेण्यात येईल व उत्तीर्ण उमेदवारांना प्रमाणपत्रे देण्यात येतील.

८) संबंधित पदविका अभ्यासक्रमाच्या परीक्षेसाठी परीक्षा शुल्क, गुणपत्रिका शुल्क व प्रवेश शुल्क शासन निर्णय क्र.एडीआर-२०११/(३२९/११)/तांशि-६, दि.२६.६.२०१२ अन्वये विहित केल्यानुसार असेल.

९) संबंधित पदविका अभ्यासक्रमाच्या विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात शासन निर्णय क्र.एडीआर-२०१४/प्र.क्र.१८८/तांशि-६, दि.१६ मार्च,२०१६ (परिशिष्ट-अ) मधील तरतूदीनुसार यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, ग्रंथालयीन साधनसामुग्री असणे अनिवार्य आहे.

१०) संबंधित पदविका अभ्यासक्रमाकरिता शासन निर्णय क्र.एडीआर-२०१४/प्र.क्र.१८८/तांशि-६, दि.१६ मार्च,२०१६ (परिशिष्ट-अ) मधील तरतूदीनुसार वर्गखोली, इतर कक्ष उपलब्ध असणे अनिवार्य आहे.

११) विद्यार्थी व विद्यार्थीनींकरिता सर्व पायाभूत सुविधा, तसेच स्वतंत्र स्वच्छतागृहाची सोय अनिवार्य आहे.

१२) विद्यार्थ्यांकरिता पिण्याच्या पाण्याची व्यवस्था अनिवार्य आहे.

१३) संबंधित पदविका अभ्यासक्रम शिकविण्याकरिता शासन निर्णय क्र.एईडी-११६३-क्यू, दि.१४ ऑगस्ट,१९६८ व शासन निर्णय क्र.एडीआर-२०१४/प्र.क्र.१८८/तांशि-६, दि.१६ मार्च,२०१६ (परिशिष्ट-अ) अन्वये विहित केलेल्या पात्रताधारक अध्यापकांची/ कर्मचा-यांची ठरीव प्रमाणाप्रमाणे (quantum) नियुक्ती करणे अनिवार्य आहे.

१४) संबंधित पदविका अभ्यासक्रमांची मान्यता कायमस्वरुपी विनाअनुदान तत्त्वावर असून सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी संस्थेकडून कोणत्याही प्रकारच्या अनुदानाची शासनाकडे मागणी केली जाणार नाही.

१५) संबंधित पदविका अभ्यासक्रमाच्या अनुषंगाने संस्थेचे वित्तीय स्थैर्य आश्वासित आहे या अटी/शर्तीच्या पुर्ततेसाठी संस्थेने राष्ट्रीयकृत बँकेत कला संचालक व संस्था चालक यांच्या संयुक्त खात्यात शासन निर्णय क्र.एडीआर-२०१४/प्र.क्र.१८८/तांशि-६, दि.१६ मार्च, २०१६ (परिशिष्ट-अ) मधील तरतूदीनुसार ठेव जमा करणे अपरिहार्य व बंधनकारक राहील व ही रक्कम संस्था चालकास कला संचालकांच्या मंजूरीशिवाय एकतर्फी उचल करता येणार नाही. तसेच नवीन कला संस्था/नवीन अभ्यासक्रम/नवीन तुकडी प्रत्यक्ष सुरु करण्यापूर्वी वित्तीय स्थैर्य ठेव पावती/कागदपत्र संबंधित संस्थेने कला संचालनालयास सादर करणे बंधनकारक आहे.

१६) शासनाकडून मान्यता प्रदान केल्यानंतर नवीन कला संस्था/जून्या कला संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरु करणे/नवीन तुकडी सुरु करण्यापूर्वी सर्व विहित अटी व शर्तीची पूर्तता कला संचालनालयाच्या स्तरावरुन करुन घेण्यात येईल व कला संचालनालयाच्या स्तरावरुन

सन २०१७-१८ मध्ये नवीन कला संस्था/जून्या कला संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरु करणे/नवीन तुकडी सुरु करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात येतील. संबंधित संस्थेकडून विहित अटी/शर्तींची पूर्तता केल्याशिवाय संचालनालयाच्या स्तरावरुन आदेश निर्गमित करण्यात येणार नाहीत.

१७) संबंधित पदविका अभ्यासक्रमाकरिता नियुक्त करण्यात येणा-या कर्मचारी वर्गास शासनाने विहित केल्यानुसार वेतन/मानधन देणे अनिवार्य व बंधनकारक राहील. या प्रकरणी न्यायालयीन अथवा इतर कोणतेही पेचप्रसंग उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित संस्थेची/कला महाविद्यालयाची राहील.

१८) महाराष्ट्र शासन, कला संचालनालय व निरीक्षक, चित्रकला व शिल्प यांचेकडून वेळोवेळी विहित केलेल्या अटी/शर्ती सर्व संबंधित कला संस्थांना बंधनकारक राहतील.

१९) शासनमान्य कला संस्था/अभ्यासक्रम/तुकडी, कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखाली राहतील. कला संस्था/अभ्यासक्रम/तुकडी याबाबत कोणत्याही बाबतीत तक्रारी प्राप्त झाल्यास त्याची तपासणी करण्याचा अधिकार कला संचालकांचा राहील व त्याबाबतचा अहवाल कला संचालक शासनास सादर करतील; आणि त्यानुषंगाने निर्णयाप्रत येण्याचा अधिकार शासनास असेल.

२०) वरील अटींपैकी एकाजरी अटीचे पालन झाले नाही तर, त्या अनुषंगाने तपासणी करण्याचा अधिकार कला संचालकांना राहील व त्याबाबतचा अहवाल कला संचालक शासनास सादर करतील; आणि त्यानुषंगाने निर्णयाप्रत येण्याचा अधिकार शासनास असेल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०१७०७०११७२९२०४४०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd66db73425a9730e4074ae475eb26788ae32a45d13639a02fcf2ffbd43272ff, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2017.07.05 11:12:38 +05'30'

**(का. रा. पिळणकर)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.प्र. कला संचालक, कला संचालनालय ,महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२.निरिक्षक, चित्रकला व शिल्प , मुंबई.

३. सर्व संबंधित संस्था,(कला संचालनालयामार्फत)

४.निवड नस्ती .